**राज्य मुख्य सेवा हक्क आयुक्त/ सेवा हक्क आयुक्त यांच्या कार्यालयासाठी प्रकल्प अंमलबजावणी समितीची** (project implementation committee) **स्थापना करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**सामान्य प्रशासन विभाग**
**शासन निर्णय क्र. संकिर्ण- २०१७ / प्र. क्र. २१२ / १८ ( र. व का. )**
मादाम कामा मार्ग, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
दिनांक : २२ जून, २०१८

**वाचा:** १) शासन निर्णय क्र. सामान्य प्रशासन विभाग क्र. सीओएम-१००१/प्र. क्र. १७४/३९, दिनांक २९.१०.२००१
२) शासन निर्णय क्र. सामान्य प्रशासन विभाग क्र. २१५६/फाईल/डीआयटी/२०१२ दिनांक २१.०९.२०१२

**प्रस्तावना :-**

सामान्य प्रशासन विभागाच्या उक्त संदर्भ क्र.१ येथील दिनांक २९.१०.२००१ रोजीच्या शासन निर्णयान्वये शासकीय कामकाजाचे संपूर्ण संगणकीकरण करण्यासाठी ई- प्रशासन धोरण जाहीर करण्यात आले आहे. या मधील परिच्छेद क्र.७ मध्ये संबंधीत प्रशासकीय विभागांनी प्रकल्प अंमलबजावणी समिती स्थापन करण्यासंदर्भात मार्गदर्शक सूचना दिल्या आहेत. तसेच उक्त संदर्भ क्र. २ येथे दिनांक २१.०९.२०१२ रोजीच्या शासन निर्णयान्वये प्रकल्प अंमलबजावणी समितीची रचना व कार्यपध्दती ठरवून देण्यात आली आहे. या तरतुदीनुसार राज्य मुख्य सेवा हक्क आयुक्त कार्यालय/ सेवा हक्क आयुक्त कार्यालये यांच्यासाठी प्रकल्प अंमलबजावणी समितीची (project implementation committee) स्थापन करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

सामान्य प्रशासन विभागाने उक्त दिनांक २९.१०.२००१ तसेच दिनांक २१.०९.२०१२ रोजीच्या शासन निर्णयान्वये दिलेल्या मार्गदर्शक सूचना/ निर्देश विचारात घेवून राज्य मुख्य सेवा हक्क आयुक्त कार्यालय, मुंबई तसेच सर्व सेवा हक्क आयुक्तांच्या कार्यालयांसाठी खालीलप्रमाणे प्रकल्प अंमलबजावणी समिती गठीत करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

| अ.क्र. | अधिकाऱ्याचे पदनाम | समितीचे पद |
|---|---|---|
| १. | अपर मुख्य सचिव/ प्रधान सचिव/ सचिव (प्र. सु., र. व का. ) | अध्यक्ष |
| २. | सचिव (वित्त) किंवा त्यांचे प्रतिनिधी | सदस्य |
| ३. | सचिव (नियोजन) किंवा त्यांचे प्रतिनिधी | सदस्य |
| ४. | उपसचिव, राज्य मुख्य सेवा हक्क आयुक्त यांचे कार्यालय / राज्य सेवा हक्क आयुक्त यांचे कार्यालय | सदस्य |
| ५. | उपसचिव (र. व का.), सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई | सदस्य |

| | | |
|---|---|---|
| ६. | अवर सचिव-२ (माहिती तंत्रज्ञान), मंत्रालय, मुंबई | सदस्य |
| ७. | एन. आय. सी. चे. प्रतिनिधी (आवश्यकतेनुसार) | सदस्य |
| ८. | कक्ष अधिकारी, राज्य मुख्य सेवा हक्क आयुक्त कार्यालय/ राज्य सेवा हक्क आयुक्त कार्यालय | सदस्य सचिव |

२. उपरोक्त समितीची कार्यकक्षा सामान्य प्रशासन विभागाच्या संदर्भाधीन शासन निर्णयातील तरतुदीनुसार राहील. सामान्य प्रशासन विभाग (माहिती व तंत्रज्ञान) यांनी वेळोवेळी घेतलेल्या निर्णयानुसार तसेच प्रदान केलेल्या अधिकरानुसार प्रकल्प अंमलबजावणी समितीस अधिकार राहतील. समितीने आवश्यकते नुसार वेळोवेळी बैठका घ्याव्यात.

३. वरीलप्रमाणे गठीत करण्यात आलेल्या समितीने प्रकल्पांना मान्यता दिल्यानंतर संगणकीकरण व तदनुषंगिक बाबी म्हणजेच संगणक, सॉफ्टवेअर, हार्डवेअर इत्यादी आवश्यक यंत्रसामुग्री खरेदी तसेच संगणक प्रणालींचे विकसन (Software Development), संदर्भाधीन शासन निर्णयानुसार व वेळोवेळी निर्गमित होणाऱ्या शासन निर्णयान्वये निश्चित केलेल्या धोरणानुसार करावे.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१८०६२२१६४५१६७९०७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Dhananjay Manik Kaned

Digitally signed by Dhananjay Manik Kaned
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=General Administration Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=e18fb94e20928aa0c627f26f27a422b56941d8107493189c499f0bcb736511ed, cn=Dhananjay Manik Kaned
Date: 2018.06.22 16:49:53 +05'30'

**(ध. मा. कानेड)**
**शासनाचे उप सचिव**

**प्रति,**

१. अपर मुख्य सचिव (वित्त), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
२. अपर मुख्य सचिव (नियोजन), नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई.
३. प्रधान सचिव (माहिती तंत्रज्ञान), सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई.
४. संचालक (माहिती व तंत्रज्ञान), सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मंबई
५. संचालक, एन. आय. सी., नवीन प्रशासन भवन, ११ वा मजला, मुंबई
६. उपसचिव राज्य मुख्य सेवा हक्क आयुक्त कार्यालय, मुंबई
७. निवड नस्ती ( कार्यासन १८ ).